ॐ

# महाराष्ट्राचे उपेक्षित मानकरी



लेखक

गंगाधर बाळकृष्ण सरदार, एम्. अे.

१९४१]

[मूल्य २ रुपये

# दोन शब्द

"महाराष्ट्राचे अुपेक्षित मानकरी" हा माझा दुसरा ग्रंथ मी आज वाचकांच्या सेवेला नम्रभावाने सादर करीत आहें. यांतील पांचहि चरित्रें 'महाराष्ट्र-साहित्य-पत्रिके'त लेखरूपाने क्रमशः प्रसिद्ध झालीं आहेत. "अर्वाचीन गद्याची पूर्वपीठिका" हा माझा पहिला ग्रंथ १९३७ सालीं प्रसिद्ध झाला. मध्यंतरींच्या काळांत सभोवतालच्या निराशाजनक परिस्थितीमुळे माझ्यामध्ये अेक प्रकारची निष्क्रियता आली होती, आणि त्यामुळे माझ्या हातून यापुढे कांही लेखन होअील किंवा नाही याबद्दल मी सांशक बनलों होतों. परंतु श्री. के. नारायण काळे हे साहित्य-पत्रिकेचे संपादक झाल्यानंतर त्यांनी मला ही चरित्रमाला गुंफण्यास प्रवृत्त केलें; अितकेंच नव्हे तर आपुलकीने माझ्यामागे निकड लावून, व वेळोवेळीं कांही मार्मिक सूचना करून माझ्याकडून हें तडीस नेवविलें याबद्दल मी त्यांचा खरोखर अत्यंत ऋणी आहें. त्याचप्रमाणे साहित्य-परिषदेचे कार्याध्यक्ष प्रिं. वामनराव जोशी, व चिटणीस रा. सा. र. लु. जोशी यांच्या प्रेमळ प्रोत्साहनाचाहि मला या ठिकाणीं कृतज्ञतापूर्वक अुल्लेख करावासा वाटतो.

माझे मित्र श्री. शंकर गणेश दाते यांनी आपल्या 'मराठी ग्रंथ-सूची'साठी अनेक दुर्मिळ ग्रंथांचा जो परिश्रमपूर्वक संग्रह केला आहे, त्याचा त्यांनी अुदार अंतःकरणाने मला अुपयोग करूं दिला याबद्दल त्यांचे जितके आभार मानावे तितके थोडेच आहेत.

जोतीराव फुल्यांच्या कार्याचें विवेचन करतांना डॉ. वि. मा. गोवंडे यांनी आपल्या आजोबांच्या चरित्रासाठी जमा केलेल्या माहितीचा

मला पुष्कळच अुपयोग झाला, याबद्दल मी त्यांचा आभारी आहें. हा ग्रंथ लिहितांना मला ज्यांच्या पुस्तकांचा व लेखांचा आधार घ्यावा लागला, त्यांचा मी त्या त्या ठिकाणीं निर्देश केला आहेच. त्या ज्ञात व अज्ञात लेखकांचे मी मनःपूर्वक आभार मानतों.

याशिवाय पुणें मराठी ग्रंथालय, मुंबअी मराठी ग्रंथालय, भा. अि. सं. मंडळाचा ग्रंथसंग्रह, केसरी ग्रंथालय, आणि मुख्यतः फर्ग्युसन कॉलेजमधील मंडलीक लायब्ररी यांचा मला पुष्कळ फायदा झाला. वरील संस्थांच्या चालकांनी मला माझ्या सोयीप्रमाणे त्यांतील ग्रंथांचा अुपयोग करून दिला याबद्दल मी त्यांचा आभारी आहें.

तसेंच मलपृष्ठाच्या सजावटीबद्दल आर्यसंस्कृति मुद्रणालयाचे व्यवस्थापक श्री. य. ग. वझे यांचेहि आभार मानणें अुचित आहे.

पुणें
२२।११।१९४१

गंगाधर बाळकृष्ण सरदार

# अनुक्रमणिका







# १
# भाऊ महाजन

विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या पूर्वी महाराष्ट्रांत स्वाभिमानी व कर्तव्रगार लेखक झालेच नाहीत, अशा भ्रामक समजुतीने मालापूर्व वाङ्मयांतील कांही श्रेष्ठ साहित्यिकांचीहि आपण बरेच दिवस अुपेक्षा केली होती. प्रा. पोतदार–फाटकप्रभृतींच्या लेखनामुळे हा समज कसा निराधार होता, हें सप्रमाण सिद्ध झाल्यानंतरहि मराठी भाषेच्या अभ्यासकांनी व अध्यापकांनी ह्या अुपेक्षित वाङ्मयाकडे फारसें लक्ष दिल्याचें दिसून येत नाही. मात्र अलीकडे गोडबोले, हळबे, लोकहितवादी, बाबा पदमनजी, कीर्तने अित्यादिकांच्या दुर्मिळ ग्रंथांचें पुनर्मुद्रण होअून, सुदैवाने ह्या पूर्वसूरींच्या वाङ्मयाचा आपणांस थोडाबहुत परिचय घडूं लागला आहे. शिवाय समाजाच्या अनिष्ट चालीरीतींवर अत्यंत तळमळीने, पण तितक्याच बेगुमानपणें कोरडे ओढल्यामुळे 'स्वजनद्रोही' ठरलेल्या लोकहितवादी, फुले यांच्यासारख्या लेखकांकडे पाहण्याचा सुशिक्षितांचा पूर्वग्रहदूषित दृष्टिकोन दिवसानुदिवस निवळत चालला आहे; आणि साहित्यसमीक्षकाच्या विशुद्ध व पक्षातीत भूमिकेवरूनच त्यांच्या वाङ्मयाचें मूल्यमापन करण्याचा काळ अगदी नजीक आला असल्याचीं चिन्हें स्पष्ट दिसूं लागलीं आहेत. अशा वेळीं मालापूर्ववाङ्मयाच्या अभ्यासाचीं जेवढीं साधनें अुपलब्ध होतील तेवढीं हवींच आहेत. ह्या दृष्टीने प्रस्तुत लेखांत अव्वल अिंग्रजींतील मराठी भाषेचे अेक निःसीम व निष्ठावंत

अुपासक, गोविंद विठ्ठल अूर्फ भाअू महाजन, यांचें जीवितकार्य थोडक्यांत निवेदन करण्याचें योजिलें आहे.

अेकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धांत स्वतंत्र बाण्याचे, निःस्पृह व विद्वान् संपादक म्हणून भाअू महाजन यांची महाराष्ट्रांत ख्याति होती. अव्याहत पंचवीस वर्षें खपून त्यांनी मराठी नियतकालिक-वाङ्मयाचा पाया घातला. मराठी वृत्तपत्रांनी व मासिकांनी गेल्या शतकांत महाराष्ट्राच्या धार्मिक, सामाजिक, शैक्षणिक व राजकीय जीवनांत जी विलक्षण क्रांति घडवून आणली, तिचें थोडेंसें श्रेय तरी मराठी नियतकालिकाच्या ह्या आद्यप्रवर्तकाला दिलें पाहिजे. भाअू महाजन यांचें कर्तृत्व खरोखरीच असामान्य होतें. कालाचा प्रवाह अनुकूल आहे, लोकांचा सक्रिय पाठिंबा आहे, साधनांची विपुलता आहे, द्रव्यसाह्य सुबलक आहे, यशाची बहुतांशीं निश्चिति आहे, अशा अुत्साहवर्धक स्थितींत संकुचित स्वार्थावर पाणी सोडून समाज-सेवेची दीक्षा घेणारे लोक थोडेफार आढळतात; पण कालाचा प्रवाह सर्वस्वी प्रतिकूल आहे, लोकांमध्ये अज्ञान व अनास्था आहे, साधन-सामुग्रीचें दुर्भिक्ष आहे, दारिद्र्याची भीषण छाया सर्वत्र पसरली आहे, यशाची आशा तर नाहीच नाही पण क्षणोक्षणीं अपयशाची धास्ती वाटते आहे अशा निराशामय स्थितींत लोकहितावर दृष्टि ठेवून केवळ कर्तव्यबुद्धीने मोठमोठीं कामें अंगावर घेणारे व अनेक दुर्धर आपत्तींशीं धैर्याने तोंड देअून तीं तडीस नेणारे खंबीर कार्यकर्ते फारच विरळा. अशा लोकोत्तर कार्यकर्त्यांत भाअू महाजन यांची गणना होते. त्यांच्या वेळची महाराष्ट्राची परिस्थिति पाहिली म्हणजेच मराठी वाङ्मयांतील त्यांच्या बिनमोल कामगिरीची बरोबर कल्पना येते.

महाराष्ट्रांत कंपनी सरकाराचा अंमल नुकताच सुरू झाला होता.

न्याय, शान्तता, सुव्यवस्था, सुरक्षितता अित्यादि गोष्टींची लोकांच्या मनावर विलक्षण पकड बसली होती. पेशव्यांच्या राज्याबद्दल बहुजन-समाजांत आपुलकीची भावना शिल्लक राहिलेलीच नव्हती. त्यामुळे मूठभर ब्राह्मण व मराठा जहागिरदारांखेरीज स्वराज्य गेल्याची कोणालाहि क्षिति वाटली नाही. पाश्चात्यांची संस्कृति भौतिक बाबतींत आमच्यापेक्षा निःसंशय श्रेष्ठ होती. छापखाने, आगगाड्या, तारायंत्र वगैरे गोष्टी पाहून आमच्या पुढाऱ्यांना युरोपांतील यांत्रिक सुधार-णेच्या प्रगतीची काहीशी कल्पना आली; त्यांच्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला; व मंत्रमुग्ध झाल्याप्रमाणे त्यांनी साहेबाच्या पायांवर सपशेल लोटांगण घातलें. हरअेक गोष्टींत आपण अिंग्रजांपेक्षा मागा-सलेले आहोंत, अशी त्यांची खात्री झाली. धर्म, भाषा, पोशाक, चालीरीती वगैरे सर्व बाबतींत अिंग्रजांचें अनुकरण करणें हें प्रति-ष्ठितपणाचें लक्षण म्हणून मानलें जाअूं लागलें. अिंग्रजी भाषेंतील अपार ज्ञानसंपत्ति पाहून आमच्या सुशिक्षितांचे डोळे दिपून गेले, व त्यांना अिंग्रजांची प्रत्येक गोष्ट चांगली वाटूं लागली. परकीय सत्तेच्या दुष्परिणामांचा दूरदर्शीपणाने विचार करण्याअितका पोंच कोणाच्याहि अंगीं अुरला नव्हता. अिंग्रज व्यापाऱ्यांची द्रव्यशोषणाची मोहीम पद्धतशीर सुरू होती. कंपनी सरकारच्या अमदानींत सर्व सुखसोयी वाढत होत्या, पण प्रजा मात्र दिवसानुदिवस निःसत्त्व व निर्धन होत चालली होती. लक्षावधि कारागीर बेकार झाले होते. पण ह्या दारुण अनर्थाचें मूळ शोधून काढण्याची कोणालाहि अिच्छा झाली नाही. देशांत गाढ अज्ञान पसरलें होतें. लोकांना आपल्या वाढत्या रोगाची जाणीव होती; पण त्याचें योग्य निदान करून नेमकी अुपाययोजना करण्याची त्यांच्या ठिकाणीं पात्रता नव्हती. नवीन सुशिक्षित लोक

सरकारी नोकरीच्या मोहपाशांत गुंतलेले होते. वैयक्तिक स्वार्थसाधनापलीकडे त्यांच्या महत्त्वाकांक्षेची मजल पोचत नव्हती. समाजाच्या हिताहिताची काळजी करण्याची त्यांना गरजच भासली नाही. अिंग्रजी भाषेचें चुटपुटतें ज्ञान संपादन करून मोठमोठ्या पगाराच्या सरकारी नोकऱ्या मिळविण्यांत ते धन्यता मानीत होते.

अशा वेळीं भाअू महाजन यांनी आपल्या चारदोन समानधर्मीयांच्या सहकार्यानें 'दर्पण-प्रभाकरा'दि वृत्तपत्रांच्या द्वारें अिंग्रजी राज्याचें सत्य स्वरूप अुघड करून दाखविण्याचा प्रयत्न केला; पण पाश्चिमात्य संस्कृतीच्या नव्यानवलाअीने भारलेल्या सुशिक्षित वर्गावर त्याचा म्हणण्याजोगा परिणाम झाला नाही. मायबाप सरकारची अिमानेंअितबारें चाकरी करण्याचें व्रत त्यांनी तसेंच अखंड चालू ठेविलें. खिस्ती धर्मोपदेशकांनी कनिष्ठ जातींतील लोकांना विश्वासांत घेअून, त्याच्यावर खिस्ती धर्माची व पाश्चात्य संस्कृतीची छाप टाकण्याचा अुद्योग आरंभिला होता. भाअू महाजन यांनी आपल्या वृत्तपत्रांतून ह्या खिस्ती आक्रमणाचा यथाशक्ति प्रतिकार केला; परंतु या बाबतींत देखील अुच्चवर्णीयाकडून पाहिजे तशी जोरकस अुठावणी झाली नाही. काही शास्त्रीपंडितांनी लहान लहान ग्रंथ छापून व वादविवाद करून, खिस्ती धर्मोपदेशकांशीं हटातटाचा सामना दिला. पण त्यांतहि त्यांची दृष्टि मुख्यतः धार्मिक, अुथळ व अेकांगी होती; खिस्ती धर्मोपदेशकांच्या ग्रंथांत हिंदुधर्माची भरपूर नालस्ती व हिंदुदेवतांची विटंबना केलेली असे. त्यामुळे धर्मनिष्ठ पंडितांच्या भावना दुखावल्या गेल्या; खिस्ती धर्मोपदेशकांबद्दल त्यांच्या अंतःकरणांत चीड अुत्पन्न झाली; आणि त्यांनी खिस्ती धर्मप्रचाराला कसून विरोध केला. मात्र सामाजिक दृष्टीने त्या आक्रमणाची कोणींच चिकित्सा

केली नाही. खालच्या वर्गांतील लोक भराभर खिस्ताच्या कळपांत शिरत होते. हिंदुसमाजाचें संख्याबल रोजच्यारोज कणाकणाने घटत होतें. पण त्याचें आमच्या धर्ममार्तंडांना कांहीच शुभाशुभ नव्हतें. ज्या कोट्यवधि लोकांच्या पायावर हिंदु धर्माची व संस्कृतीची भव्य अिमारत अुभारलेली होती, त्या पायांतच खिस्ती धर्मोपदेशकांनी सुरुंग लावण्याचा खटाटोप सुरू केला होता. त्याचा सुसंघटित रितीने प्रतिकार करण्याचें कोणीं मनांत आणलें नाही. लोकहितवादींनी मात्र सभोंवतालच्या परिस्थितीची बारकाअीने पाहणी करून समाजसंघटनेच्या दृष्टीने फुटकळ स्वरूपांत कां होअीना, पण आमच्या गुणदोषांचें मार्मिक व मूलग्राही विवेचन केलें; पण रूढिग्रस्त पंडितांना तें रुचलें नाही. लोकहितवादींचीं हीं शतपत्रें भाअू महाजन यांच्या 'प्रभाकरां'त क्रमशः प्रसिद्ध झालीं होतीं.

परधर्मीयांच्या पोशाखाचें व चालीरीतींचें भ्रष्ट अनुकरण करण्याचा परिपाठ महाराष्ट्रांत रूढ होत होता. भाअू महाजन यांनी वेळोवेळीं या परधार्जिण्या वृत्तीचा तीव्र निषेध केला आहे. सुशिक्षित लोकांच्या स्वाभिमानशून्यतेचा त्यांना फार तिटकारा होता. अिंग्रजी शिकणाऱ्या तत्कालीन विद्यार्थ्यांना मराठी भाषा गांवढळ व रानटी आहे असें वाटे. साध्यासुध्या बोलण्यांतहि शक्य तितके अिंग्रजी शब्द वापरण्यांत ते भूषण मानीत. ह्या आत्मघातकी प्रवृत्तीवर 'प्रभाकर'पत्राने खरमरीत टीका केली होती. सारेजण राज्यकर्त्यांच्या भजनीं लागले असताहि भाअू महाजन यांनी महाराष्ट्राचा स्वाभिमान टिकवून धरण्याची पराकाष्ठा केली. त्याबरोबरच त्यांनी आपल्या दोषांकडे डोळेझाक केली नाही. त्यांच्या स्वभावांत अेककल्लीपणा व दुराग्रह बिलकूल नव्हता. भौतिक शास्त्रांच्या बाबतींत आपणांस

पाश्चात्यांचें ऋण घेतलें पाहिजे, अशी त्यांनी आपल्या मनाशीं खूणगांठ बांधली; आणि 'दिग्दर्शन' व 'त्रैमासिक ज्ञानदर्शन' हीं नियतकालिकें काढून, अिंग्रजी भाषेंतील शास्त्रीय ग्रंथांचीं भाषान्तरें करण्यास प्रारंभ केला. त्यांची विद्वत्ता व परिश्रमशीलता अचाट होती. त्याच्या नुसत्या भाषान्तरात्मक वाङ्मयाचा जरी पसारा पाहिला तरी आजहि आश्चर्यानें मन थक्क होअून जातें.

'निबंधमालेच्या पूर्वीचा काळ म्हणजे मराठी वाङ्मयाच्या अितिहासांतील तमोयुग होतें. तत्कालीन लेखकात स्वाभिमानाचा लवलेशहि नव्हता. स्वदेश, स्वधर्म, स्वभाषा अित्यादिकांची त्याना बिलकूल चाड नव्हती. अिंग्रजाचे गोडवे गाण्यांतच त्यानी आपल्या बुद्धीचा अपव्यय केला; अितकेंच नव्हे तर, अुटल्यासुटल्या आपल्या दोषाचे पाढे वाचून राष्ट्राचा तेजोभंग केला. परंतु त्यानंतर विष्णुशास्त्र्यांसारखा लोकोत्तर पुरुष महाराष्ट्रांत जन्माला आला. त्यानेच देशाला स्वाभिमानाचा संदेश दिला व राष्ट्रात नवचैतन्य निर्माण केलें.' अशा अनिष्ट व खोट्या विचारप्रणालीचे पडसाद अद्यापहि कोटे कोठे अैकू येतात. मालापूर्ववाङ्मयाचें निःपक्षपातीपणाने परिशीलन केल्यास ह्या दुराग्रहाला काहीचाहि आधार मिळणार नाही. परकीय आक्रमणाच्या वावटळीने महाराष्ट्रातील स्वाभिमानाची ज्योत किंचित् मंदावली असली, तरी ती अजिबात केव्हाच मालवलेली नव्हती.[१]

१ "In 1818 the Peshwa was overthrown near Poona and stripped of his dominions. The shock was tremendous. But the fierce Maratha spirit was only curbed, not crushed."

—Rev. J. Murray Mitchell.
—*Recollections of My Early Missionary Life*. P.24.

अव्वल अिंग्रजींतील सरकारी छापाचें भाडोत्री वाङ्मय वगळल्यास रामकृष्ण विश्वनाथ, सखाराम दीक्षित मनोहर, बाळ भास्कर शिंत्रे, लक्ष्मण नृसिंह जोशी,' भवानी विश्वनाथ कानविंदे, नीळकंठ जनार्दन कीर्तने अित्यादि नवशिक्षित तरुणांनी त्या काळीं स्वयंस्फूर्तीने लिहिलेल्या लेखांत स्वदेशाभिमानाची भावना ओतप्रोत भरलेली होती. ह्या स्वाभिमानी सुशिक्षितांच्या परंपरेंत भाअू महाजन हे अग्रेसर होते. त्यांनी मुद्रणस्वातंत्र्याचा फायदा घेअून आपल्या 'प्रभाकर'पत्रांत गरीबगुरीब जनतेच्या गाऱ्हाण्यां वेशीवर टांगण्यास सुरवात केली, अिंग्रज अधिकाऱ्यांच्या अुन्मत्तपणावर निर्भीडपणें फटकारे ओढले, व अिंग्रजी अंमलाची दुसरी बाजू लोकांच्या निदर्शनास आणून दिली. त्यांच्या परिश्रमांचें चीज होण्यासारखी त्या वेळीं परिस्थिति नव्हती. बहुजनसमाज सुप्त होता. त्याला कार्यप्रवण करण्यासाठी भगीरथ प्रयत्नांची आवश्यकता होती. दिखाअू देशभक्तीचा व सुलभ प्रसिद्धीचा तो काळ नव्हता. यशापयशाची फिकीर न करतां, निरलसपणें काम करीत राहणाऱ्या जातिवंत कार्यकर्त्यांची तेव्हा देशाला गरज होती. भाअू महाजन यानी हें अचूक ओळखलें, व सरकारी नोकरीची हाव न धरता लोकशिक्षणाच्या कार्यात आपलें शक्तिसर्वस्व खर्च केलें. त्यांतच त्यांचा खरा मोठेपणा आहे.

भाअू महाजन यांच्या व्यक्तिगत जीवनाबद्दल फारच थोडी माहिती अुपलब्ध आहे. अव्वल अिंग्रजींतील बहुतेक सर्व साहित्यिकांच्या बाबतींत हीच रडकथा गाण्याचा नेहमी प्रसंग येतो. त्यांतल्या त्यांत सरकारी नोकरींत मोठमोठ्या हुद्द्यावर काम केलेल्या छत्रे, जांभेकर, दादोबा पांडुरंग, देशमुख, कीर्तने अित्यादि लेखकांचीं लहानसहान चरित्रें तरी लिहिलीं गेलीं; परंतु सरकारी नियंत्रणापासून चार पावलें

दूर राहाणाऱ्या मराठी भाषेच्या या अनन्यभक्ताचा महाराष्ट्राला लवकरच विसर पडला. साठ वर्षांपूर्वी विष्णुशास्त्री चिपळूणकरां-सारख्या वाङ्मयीन युगप्रवर्तकाला भाऊ महाजन यांचें नांवदेखील ठाऊक नव्हतें. मग अितरेजनांची गोष्ट विचारावयालाच नको. सुदैवाने त्यानंतरहि दहा वर्षें महाजन हयात होते. पण नागपुरास त्यांच्यापाशीं जाऊन मालापूर्ववाङ्मयाचा सांगोपांग वृत्तान्त संकलित करण्याची कोणाला बुद्धि झाली नाही. आमच्यांतील अैतिहासिक दृष्टीच्या अभावानें हें सबळ प्रत्यन्तरच होय.

भाऊ महाजन यांचा जन्म पेण येथे अि.स. १८१५ त झाला. त्यांचें मूळचें अुपनांव कुंटे. 'भाऊ महाजन' या नांवानेच त्यांना मुंबअींत सर्व जण ओळखीत असत. अर्वाचीन मराठी गद्याचे जनक सदाशिव काशीनाथ अूर्फ बापू छत्रे यांचे हे मेहुणे. ते आठ वर्षांचे असतांना बापूंनी त्यांना शिक्षणासाठी मुंबअीस आपल्या घरीं आणलें. अेल्फिन्स्टन विद्यालयांतील आर्लिबार व हार्कनेस् ह्या दोघां नामवंत प्राध्यापकांच्या हाताखाली त्यांनी आपलें शिक्षण पूर्ण केलें. बापू छत्रे हे मराठी भाषेचे रसिक व मर्मज्ञ लेखक होते. त्यांचे कथाग्रंथ शुद्ध, सुबोध व रसाळ भाषेचे नमुने म्हणून प्रसिद्ध आहेत. लहानपणा-पासून महाजन त्यांच्या सहवासांत वाढले. त्यामुळे साहजिकच त्यांना मराठीचा आस्थापूर्वक अभ्यास करण्याची गोडी लागली. बाळशास्त्री जांभेकर हेहि विद्यार्थिदशेंत छत्र्यांचेच आश्रित होते. 'सतां सद्भिः संगः कथमपि हि पुण्येन भवति' या न्यायाला अनुसरून मराठी भाषेच्या पूर्वपुण्याअीमुळे जांभेकर व महाजन हे दोघेहि छत्र्यांसारख्या अधिकारी मनुष्याच्या घरीं अेकत्र आले असें म्हणावें लागतें.

भाऊ महाजन यांची बुद्धि कुशाग्र होती. अिंग्रजी, संस्कृत,

फारशी ह्या तीन्ही भाषा त्यांना चांगल्या अवगत होत्या. भौतिक शास्त्रांच्या व्यासंगावर त्यांचा विशेष भर होता. तत्कालीन वाङ्मयांत ज्या ज्या ठिकाणीं त्यांच्या नांवाचा अुल्लेख आला आहे, त्या त्या ठिकाणीं त्यांच्या गाढ विद्वत्तेची तारीफ केलेली आढळते. त्या काळीं हिंदुस्थानांत विद्यापीठांची स्थापना झालेली नव्हती. शिक्षणाची कालमर्यादा आजच्या मानाने पुष्कळ कमी होती. विशीच्या आंतच अेल्फिन्स्टन विद्यालयांत गणिताचे अध्यापक म्हणून जांभेकरांची नेमणूक झाली. भाअू महाजन यांनीहि सतराव्या वर्षी आपला शिक्षणक्रम संपवून, जांभेकरांच्या सहकार्याने 'दर्पण' पत्र सुरू केलें. अेवढ्या अल्पवयांत त्यांनी संपादिलेल्या ज्ञानाची व्याप्ति व सखोलता पाहिली म्हणजे त्यांच्या विद्याभिरुचीपुढे आदराने मस्तक नम्र होतें.

विद्वत्तेची थोरवी निःसंशय मोठी आहे. पण त्यागाचा महिमा त्याहूनहि विलक्षण आहे. भाऊ महाजनांचें श्रेष्ठत्व विद्वत्तेपेक्षा त्याच्या त्यागवृत्तींत आहे. पहिल्यापासूनच त्यांनी आपल्या आयुष्याचें धोरण निश्चित केलें असावें, असें स्पष्ट दिसतें. त्यांच्या काळीं आजच्याप्रमाणे सुशिक्षितांना नोकरीसाठी वणवण करीत हिंडण्याची गरज नव्हती. त्यांच्या बरोबरीच्या बहुतेक तरुणांनी नोकरीचा पेशा पत्करला होता. त्यांची तशी तयारी असती तर मोन्यासारखी सरकारी नोकरी घरीं चालून आली असती. पण त्यांचा ध्येयवाद अितका दुबळा नव्हता. मानमरातब व पैसा ह्या दोहोंचाहि मोह त्यांनी सोडला व लोकसेवेचा खडतर मार्ग स्वीकारला. या अेकाच गोष्टींत त्यांच्या जीवनाचें सारसर्वस्व ग्रथित झालेलें आहे.

आरंभीं त्यांनी समाजस्थितीचा काळजीपूर्वक विचार केला. लोक हीन, दीन व दुर्बल झाले होते. त्यांना समर्थ व ज्ञानसंपन्न करण्या-

वाचून तरणोपाय नव्हता; तेव्हा ज्ञानप्रसाराचें प्रभावी साधन म्हणून त्यांनी सुरवातीलाच वृत्तपत्रव्यवसायांत मन घातलें. बाळशास्त्री जांभेकर व भाअू महाजन यांनी दोघांनी मिळून मुंबअीस अि. स. १८३२ त 'दर्पण' या नावाचें अिंग्रजी-मराठी पाक्षिक काढलें. त्याचप्रमाणे शास्त्रीय ज्ञानाच्या प्रसारासाठी त्यांनी अि. स. १८४० सालीं 'दिग्दर्शन' मासिक सुरू केलें. 'दर्पण' सुमारें आठ वर्षे चाललें. त्यानंतर भाअू महाजन यानी आपल्या स्वतःच्या संपादकत्वाखाली 'प्रभाकर' साप्ताहिक चालू केलें. हें पत्र महाराष्ट्रात चांगलेंच लोकप्रिय झालें. ख्रिस्ती धर्मप्रचारकांचे प्रसिद्ध प्रतिस्पर्धी विष्णुबोवा ब्रह्मचारी हे मुंबअीस धर्मपर व्याख्यानें देत असत. त्याच्या विक्षिप्तपणावर भाअू महाजन यांचा फार कटाक्ष होता. 'प्रभाकर' पत्रात ते त्यांच्या व्याख्यानांची नेहमी रेवडी अुडवीत. त्यास तोडीस तोड म्हणून विष्णुबोवाच्या अनुयायानी 'वर्तमानदीपिका' पत्र काढलें व त्याची वार्षिक वर्गणी फक्त पांच रुपये ठेवली. 'दीपिके'चे संपादक भवानी विश्वनाथ कानविंदे होते. 'प्रभाकरा'ची वर्गणी बारा रुपये होती. तेव्हा 'दीपिके'शीं सामना देण्यासाठी भाअू महाजनांनी 'धूमकेतु' पत्र अस्तित्वांत आणलें, व त्याची वर्गणी अवघी चार रुपये ठेवली होती. 'धूमकेतु' व 'दीपिका' यांचा वाद पुढे बराच रंगला. वादविवादाच्या भरात दोन्ही पक्षांकडून केव्हा केव्हा मर्यादेचें अतिक्रमण होअी. पण त्या वेळीं ह्या पत्रांनी चिपळूणकराच्या निबंधमालेप्रमाणे मुंबअीकरांचें चित्त वेधून टाकलें होतें. याच सुमारास त्यांनी 'ज्ञानदर्शन' या नांवाचें मुख्यतः शास्त्रीय विषयांना वाहिलेलें त्रैमासिक चालविलें होतें. अशा रितीने वृत्तपत्रव्यवसायांत अुणींपुरीं दोन तपें घालवून त्यांनी आपल्या संपादनचातुर्याने मायभाषेचे पांग फेडले.

त्रैमासिक 'ज्ञानदर्शना'मुळे मराठी भाषेंतील कुशल भाषान्तरकार म्हणून भाऊ महाजन यांची सर्वत्र ख्याति झाली होती. मुंबअी अिलाख्याचे विद्याधिकारी मे. हॉवर्ड यांनी त्यांना कांही शालोपयोगी पुस्तकांचें व बेकनच्या 'नोव्हम् आर्गेनम्' या ग्रंथांचें भाषान्तर करण्याविषयी विचारणा केली होती.[1] भाअूंनी त्यांची योजना मान्य केली; पण "मराठी आमची मातृभाषा आहे. तिच्यांतील शुद्धाशुद्धतेची आम्हास चांगली माहिती आहे. त्या बाबतींत परकीयांकडून धडे घेण्याची आम्हाला गरज नाहीं. तेव्हा माझे भाषान्तरित ग्रंथ सरकारी विद्याखात्याचे मराठी ट्रान्सलेटर मेजर क्याडी यांच्याकडे तपासणीस जाता कामा नयेत." असा त्यांचा आग्रह होता. मि. हॉवर्ड यांनी तो मान्य केला नाही. भाअू महाजन यांचा स्वभाव करारी होता. शेदोनशे रुपड्यांच्या लोभाने त्यांनी आपल्या बाणेदार वृत्तीला डाग लागूं दिला नाही. मात्र यामुळे मराठी भाषा कांही भाषान्तरात्मक ग्रंथांना मुकली.

भाअू महाजन यांनी स्वतंत्र ग्रंथ लिहिलेले नाहीत. त्यांचें सर्व लिखाण नियतकालिकांमधूनच प्रसिद्ध झालेलें आहे. फक्त अि. स. १८४३ त विनायकशास्त्री दिवेकर व महाजन यांनी जांभेकरांच्या साह्याने 'शब्दसिद्धिनिबंध' या नावाचें अेक छोटेखानी पुस्तक प्रसिद्ध केलें. अि.स. १८६० नंतरची त्यांची कोणतीहि वाङ्मयीन कृति अुपलब्ध नाही. अेन अुमेदींत मराठी भाषेच्या अुद्धारासाठी जिवापाड परिश्रम करणारे हे गृहस्थ आयुष्याच्या अुत्तरार्धांत पंचवीस तीस वर्षे अजिबात स्वस्थ कसे बसले याचें नवल वाटतें. कदाचित् आपला कार्यभाग संपला, आता नवीन नवीन होतकरू व

१ विविधज्ञानविस्तार— १८९० (पु.२२ अं.१-२).

अुत्साही तरुणांच्या हातांत मराठी साहित्याचीं सूत्रें गेलीं पाहिजेत, अशा भावनेने ते कार्यनिवृत्त झाले असावेत. तीस वर्षांनंतर सरकारी नोकरींतहि पेन्शन मिळतें; मग त्यापेक्षाहि कष्टमय अशी लोकांची चाकरी करून पंचवीस-तीस वर्षांनंतर भाअू महाजन यांनी पेन्शन न घेतां नुसती विश्रांति घेतली असली तर त्यांत कांहीच गैर नाही. त्यांचे अेकुलते अेक चिरंजीव बळवंतराव सरकारी नोकर होते. त्यांच्याबरोबर पुढे ते नागपुरास जाअून राहिले. शेवटपर्यंत तेथेच त्यांचें वास्तव्य होतें. अि.स.१८९० मध्ये ते दिवंगत झाले.

मालापूर्ववाङ्मयांतील बहुतेक ग्रंथ आता दुर्मिळ झाले आहेत. मुंबअी, पुणें, ठाणें, बडोदें अित्यादि शहरांतील मराठी ग्रंथसंग्रहालयांतून कांही कांही ग्रंथांची अेखाददुसरी प्रत दृष्टीस पडते. सर्व ग्रंथ अेका ठिकाणीं अेकत्र पाहावयास मिळणें प्रायः अशक्यच. ग्रंथगत वाङ्मयाची ही अवस्था ! मग नियतकालिक वाङ्मयाची स्थिति काय वर्णावी ! वृत्तपत्रांचीं व मासिकांचीं कालानुक्रमाने बांधलेलीं पुस्तकें मुळीच सांपडत नाहीत. कांही मासिकांचे व वर्तमानपत्रांचे सुटे अंक व अेखाददुसऱ्या वर्षाचें बांधीव पुस्तक क्वचित् कोठे आढळतें. त्यामुळे भाअू महाजनांच्या समग्र लिखाणाची तपशीलवार माहिती देअून त्याबद्दल निर्णायक मतें मांडणें फार कठीण झालें आहे. तरी देखील जीं थोडींबहुत साधनें हातीं आलीं आहेत, तेवढ्यावरून त्यांच्या साहित्यविषयक कामगिरीचें सामान्य स्वरूप स्थूल मानाने कळण्यासारखें आहे.

भाअू महाजन यांनी स्वतः अेकट्यांनी व अितरांच्या सहकार्याने पुढील नियतकालिकें काढलेलीं होतीं– (१) दर्पण– पाक्षिक अि.स. १८३२, (२) दिग्दर्शन– मासिक अि.स. १८४०, (३) प्रभाकर-

साप्ताहिक अि. स. १८४१, (४) धूमकेतु– साप्ताहिक अि. स. १८५३, (५) ज्ञानदर्शन– त्रैमासिक अि. स. १८५४.

'दर्पण' हें मराठी भाषेंतील पहिलें वृत्तपत्र होय. मागे विविध-वृत्तांत (अि.स. १९३३) रा. मोरेश्वर दाजी पाणसरे यांनी त्यांतील निवडक अुताऱ्यांसह त्यासंबंधी अेक लेखमाला गुंफली होती. तीमध्ये या पाक्षिकाविषयीं त्यांनी संक्षिप्त पण साधार माहिती दिलेली आहे. हें पत्र त्या वेळच्या पद्धतीप्रमाणें अिंग्रजी-मराठी होतें. त्याचा पहिला अंक ता. ६ जानेवारी १८३२ रोजीं निघाला. त्रैमासिक वर्गणी ६ रु. होती. प्रत्येक पृष्ठाचे दोन भाग पाडून, अर्ध्या बाजूस मूळ अिंग्रजी मजकूर व समोर मराठी भाषान्तर छापीत असत. प्रजेचें मनोगत राज्यकर्त्यांना सहजगत्या समजावें म्हणून मूळ मजकूर अिंग्रजींत लिहिण्याचा परिपाठ असावा. या पत्रातील अिंग्रजी भाग बाळशास्त्री जांभेकर लिहीत व त्याचें मराठी भाषान्तर भाअू महाजन याच्या हातचें असे. जांभेकरांचें अिंग्रजी भाषेवर असामान्य प्रभुत्व होतें. त्याबद्दल खुद्द गव्हर्नरसाहेबांनी त्यांचा गौरव केला होता. पहिल्या अंकातील 'प्रस्तावा'त त्यांनी आपली योजना विशद केली आहे. त्याच अंकात वर्तमानपत्राच्या अुपयुक्ततेवर अेक दुसरा लेख आलेला आहे. त्यावरून त्याचा अुद्देश स्पष्ट होतो. "स्वदेशीय लोकांमध्ये विलायतेंतील विद्येचा अभ्यास अधिक व्हावा; आणि या देशाची समृद्धि व अेथील लोकांचें कल्याण याविषयीं स्वतंत्रतेनें व अुघड रीतीने विचार करावयास स्थल व्हावें या अिच्छेनें[1]" जांभेकर व महाजन यांनी मुंबअींतील धनिकांच्या साह्याने 'दर्पण'पत्र काढलें. ह्या वेळीं त्यांच्या डोळ्यांपुढे अिंग्रजी व बंगाली नियतकालिकें

१ प्रस्ताव— दर्पण ६।१।१८३२.

असावींत असें दिसतें. पहिल्या बंगाली वृत्तपत्राचें नांव समाचार-दर्पणच होतें, व मराठी 'दर्पणा'च्या प्रस्तावनेंत "दर्पणांत जाहीर खबरा आणि विलायतचे व बंगालचे पत्रांचे कांहीं कांहीं अंश (extracts) लिहिले जातील" असा मजकूर आढळतो. शिवाय बंगाली लोकांना अिंग्रजांचा सहवास जास्त लाभला. त्यामुळे आपल्या-पेक्षा ते बरेच पुढारले आहेत, त्यांच्याप्रमाणेच आपण आपली प्रगति करून घेतली पाहिजे, असे विचार पहिल्या अंकांत दृष्टीस पडतात.

"या विस्तृत देशांत अिंग्रजांचें राज्य झाल्यापासून लोकाची नीति आणि ज्ञान वाढायाविषयीं प्रयत्न होत गेले, आणि या सुज्ञ राजांचे लोकोपकारक उद्योग अितक्या थोड्या काळात असे सफल होतील, असें वाटत नव्हतें. बंगाल प्रात अिंग्रेजांचे हातीं येअून साठसत्तर वर्षे झालीं. परंतु अितक्यातच त्या देशाचे स्थितींत जें अंतर पडलें, तें पाहिलें असता विस्मय होतो. जो देश सुमारें शंभर वर्षांपूर्वी बलात्कार, जुलूम आणि कुनीति यांचें केवळ घर होता, तो आता निर्भयपण आणि स्वतंत्रता भोगतो आणि तेथील लोकांस युरोपखंडांतील विद्या आणि कलांचें विशेष ज्ञान होत आहे, हें पाहून चांगला राजा आज्ञेंत वागणाऱ्या प्रजांचें कल्याण करायास अिच्छितो, तर त्यांचे हातून काय काय घडेल यास योग्य दृष्टान्त सांपडतो. हा हिंदुस्थानचा प्रदेश अिंग्रेजी अंमलाखालीं येअून जरी थोडकींच वर्षे झालीं आहेत, तरी जो अज्ञानांधकार फार दिवसपर्यंत या देशास व्यापून होता तो जाण्यास प्रारंभ झाला आहे; आणि बंगाल देशाचे लोक सांप्रत आमचेपेक्षां ज्या गुणामध्यें विशेष आहेत त्यांमध्यें आम्ही त्यांचेसारिखे होअूं असा दिवस लवकरच येअील अशी आम्ही आशा करीत आहों. विद्येपासून आणि सरळ बुद्धीपासून जीं फळें

होतात त्यांचें यथार्थ ज्ञान युरोपियन लोकांशीं बहुत दिवस सलगीचें संघटन पडल्यामुळें बंगालचे लोकांस झालें आहे. या गोष्टी त्यांचे मनांत पक्केपणीं ठसून त्यांनी स्वदेशीय लोकांचे विद्याभ्यासाकरितां प्रयत्न केले. आणि ते त्यांचे यत्न सफल झाले. तेथें विद्या वाढण्यास आणि सरळ बुद्धि होण्यास कारणें मुख्यत्वेंकरून दोन. अेक सर्व विद्यालय म्हणजे सर्व विद्यांची शाळा आणि दुसरें तेथें जीं बहुत तद्देशीय वर्तमानपत्रें छापून प्रसिद्ध होतात तीं. बरें असेच अुपाय येथें केले तर अशीं फळें न होतील कीं काय ?"

"मनोरंजन करणें, चालते काळाचीं वर्तमानें कळविणें, आणि योग्यतेस येण्याचे मार्ग दाखविणें, या गोष्टींची दर्पण छापणारास मोठी अुत्कंठा आहे; म्हणोन या गोष्टी साध्य होण्यासाठीं जितका प्रयत्न करवेल तितका ते करितील." प्रस्तावांतील ह्या विधानावरून संपादकानी वृत्तपत्रांची मुख्यतः मनोरंजन, वृत्तनिवेदन, आणि ज्ञान-संवर्धन अशीं तीन अंगें कल्पिलेलीं दिसतात. ह्या पत्रांत ठिक-ठिकाणच्या बातम्या, वाचकानी निरनिराळ्या विषयावर लिहिलेलीं पत्रें, व जरठ-कुमारी-विवाह, मिशनऱ्याचे अुपद्व्याप, स्त्रीशिक्षण, हिंदु नाटकशाळा, वाफयंत्र अित्यादि छोटेखानी लेख प्रसिद्ध झालेले आहेत.

संपादकीय लेखांची भाषा रोजच्या बोलण्यांतील भाषेप्रमाणें साधी व सुटसुटीत आहे. शुद्ध देशी शब्दांचा वापर जास्त आहे. नवीन बनविलेले शब्द साहजिकच संस्कृत आहेत. त्यातील फारच थोडे शब्द अन्वर्थक वाटतात. वाक्यें लहान लहान व तोकडीं आहेत. संपादकीय मजकूर मुळांत अिंग्रजींत लिहिला जात असावा. कारण

---

१ दर्पण ता. ६।१।१८३२.

मराठी लेखांत मधून मधून अिंग्रजी घाटणीची वाक्यरचना दिसून येते. अुदा०—

"अशा अुद्योगास या देशचे लोकांची सहायता योग्य असें जाणून आशा धरिली आहे कीं, खचित त्यांपासून हें वर्तमानपत्र घेणें आणि त्याचे पूर्णतेकरतां विषय लिहून पाठविणें यां दोनीही रीतींनीं मदतगारी होअील; तसाच भरंवसा वाटतो कीं, अिंग्रेज लोकांची सर्व मनुष्यमात्रीं दया आहेच; म्हणोन तेही यास आश्रय देतील."

"यद्यपि या लेखांचीं फळें संसारांतील सामान्य व्यवहारांत अुपयोगी नव्हत. आणि लाभ नसताही केवळ सुरूपतेस येण्याचे साधनाचा विचार करणारे जे विद्वान् त्यांस मात्र संतोषकारक होत. म्हणोन अशा फळांपासूनच या लेखांचा थोरपणा वर्णावा असें नाहीं. तथापि लोकांस लाभ देणाऱ्या गोष्टीही यापासून घडतात."

त्या काळीं 'दर्पण' पत्राला बरीच प्रसिद्धि मिळाली होती. इ.स. १८४० च्या सुमारास तें बंद पडलें.

बाळशास्त्री जांभेकर व भाअू महाजन यानी अि.स. १८४० मध्ये 'दिग्दर्शन' या नांवाचें मासिक सुरू केलें.[१] त्याची वार्षिक

१ An extract from the Bombay Times of 1839.

"We perceive by an advertisement in our contemporary the Durpan that it is intended to publish in Bombay a Monthly Magazine in the Marathi language .... This, we believe, is the first attempt of the kind made in our city ..... The following is the advertisement

To be published under the patronage of the community.

वर्गणी पांच रुपये होती. त्यामध्ये मुख्यत्वेंकरून शास्त्रीय व नीति-विषयक लेख प्रसिद्ध होत असत. हें मासिक निदान तीन वर्षें तरी चालू होतें. कारण अि.स.१८४३ सालीं 'Oriental Christian Spectator' ह्या ख्रिस्त्यांच्या अिंग्रजी मासिकांत त्यावर प्रतिकूल अभिप्राय आलेला आहे; व त्या वेळीं मराठींत 'दिग्दर्शन' व 'ज्ञानोदय' हीं दोन मासिकें निघत होतीं, असें म्हटलें आहे. 'दिग्दर्शना'च्या तिसऱ्या पुस्तकांत विद्यापर्वत (रूपक), ग्रेट ब्रिटन देशाची राज्यरीति, ज्योतिषशास्त्र, परमेश्वराची सर्वज्ञता, भूगोलशास्त्र, रुप्याच्या खाणी, आग्रा शहराचें वर्णन, शास्त्रांतील संज्ञा, कागदाच्या कृतीविषयीं, अित्यादि लेख आढळतात. त्यांतील बहुतेक लेख भाषान्तरात्मक आहेत. या मासिकाच्या लेखनकार्यांत भाऊ महाजन यांचा प्रत्यक्ष भाग किती होता हें कळण्यास कांहीं मार्ग नाही. 'दिग्दर्शना'चा वाचकवर्ग अिंग्रजी शाळांतील विद्यार्थ्यांपुरताच मर्यादित असावा. सर्वसामान्य साक्षर लोकांत त्याचा फारसा प्रसार झाला असेल असें वाटत नाही.

बाळशास्त्री जांभेकर यांना सरकारी नोकरी व वाङ्मयोपासना असें दुहेरी अवधान सांभाळावें लागे. त्यांच्या कामाचा व्याप दिवसानु-

---

Dig-Durshun, or a monthly Magazine in Marathi—to contain a summary of intelligence, short essays and articles, original and select, on subjects connected with Geography, History, Natural Philosophy, Chemistry, and General science, with occasional illustrations in lithography ...."

—*The Times of India*, 11 January 1939.

दिवस वाढत चालला होता. तेव्हा भाऊ महाजन यांनी स्वतःच्या हिंमतीवर इ.स.१८४१ मध्ये 'प्रभाकर' पत्र काढलें. तें दर रविवारीं निघत असे. त्याची वार्षिक वर्गणी बारा रुपये होती. प्रभाकराचें धोरण पहिल्यापासून अगदी निराळें होतें. त्यांत सरकारची व अधिकाऱ्यांची फाजील स्तुति कोठेंहि दिसत नाही. लोकांच्या अडचणी व गाऱ्हाणीं सरकारच्या कानांवर घालून त्यांच्या न्याय्य मागण्यांचा पाठपुरावा करणें हें वृत्तपत्रांचें मुख्य कर्तव्य होय. याच भावनेने भाऊ महाजन आपलें पत्र चालवीत असत. त्यामुळे तें लवकरच लोकप्रिय झालें. महाराष्ट्रांतील दूरदूरच्या प्रदेशांत त्याचे वर्गणीदार होते; व ते प्रत्येक अंकाची मोठ्या उत्सुकतेने वाट पाहत असत. प्रसिद्ध ख्रिस्ती लेखक बाबा पदमनजी यांनी आपल्या 'अरुणोदय' नामक आत्मचरित्रांत या गोष्टीचा मुद्दाम उल्लेख केला आहे. ते म्हणतात, "'प्रभाकर' पत्र वाचण्याची मला फार आवड होती. बेळगांवांत आमच्या शेजारीं विनायकपंत रानडे या नांवाचे अेक ब्राह्मण सर्वेयर राहत असत. ते हें पत्र घेत. त्यांस त्या दिवसांत रविवारचा प्रभाकर शुक्रवारीं टपालांतून मिळे व त्यास ट. ह. अेक आणा पडे! तो हातीं आला म्हणजे त्यांनीं आमच्या घरीं येऊन ओट्यावर बसून मला मध्यें उभे करून मजकडून तो समग्र वाचवावा. हें पत्र अेकण्यास बरीच मंडळी जमत असे. याप्रमाणे कित्येक वर्षें चाललें होतें."[1]

वेगवेगळ्या पेशांच्या, मतांच्या व स्वभावांच्या लोकांना 'प्रभाकर' वाचण्याची अिच्छा व्हावी, म्हणून भाऊ महाजन यांनी त्यांत विविध गोष्टींचा समावेश केला होता. निरनिराळ्या अिंग्रजी वृत्तपत्रांतील

१ अरुणोदय (आ.२ री) पृ.८७.

महत्त्वाच्या बातम्यांचा ते गोषवारा देत असत. 'प्रभाकरां'तील वाचकांच्या पत्रव्यवहाराचें सदर फार उपयुक्त व मोठें होतें. अनेक तऱ्हेचीं पत्रें त्यांत आढळतात. कांही पत्रांत समाजांतील अनिष्ट चालींवर व वेडगळ समजुतींवर प्रहार केले आहेत. कांही पत्रें लोकांच्या स्थानिक गैरसोयी चव्हाट्यावर मांडण्यासाठी लिहिलेलीं आहेत. त्या काळच्या अत्यंत जिव्हाळ्याच्या पण विवाद्य अशा नानाविध विषयांची चर्चा प्रभाकरांत पत्ररूपाने होत असे. बहुतेक पत्रें टोपणनांवांनी लिहिलेलीं आहेत. 'स्वदेशाभिमानी', 'धर्माभिमानी', 'स्पष्टवक्ता', 'निःस्पृही' इत्यादि टोपणनांवें तत्कालीन लेखकांच्या मनोवृत्ति दर्शवितात. पत्रांवर विषयबोधक मथळे देण्याची पद्धति त्या वेळीं रूढ झालेली नव्हती. तत्कालीन विचारप्रवाहांचें स्वरूप लक्षांत येण्यास या पत्रांचा बराच अुपयोग होण्यासारखा आहे. कांही पत्रांना अनुलक्षून केव्हा केव्हा संपादक आपला अभिप्राय व्यक्त करीत असत. संपादकीय लिखाणांत सातारा प्रकरण, ग्रेट ब्रिटन देशाची राजनीति, फ्रेंचांचे बंडाचा वृत्तान्त अित्यादि विषयांवर सविस्तर व विचारप्रवर्तक लेखमाला प्रसिद्ध झाल्या आहेत. क्वचित् अेखाद-दुसऱ्या पुस्तकावर अभिप्राय दिलेला आढळतो. सारांश, लोक-हिताच्या दृष्टीने अुपयुक्त अशा प्रत्येक बाबीचा यथोचित परामर्श घेण्याची प्रवृत्ति 'प्रभाकर'कर्त्यांच्या ठिकाणीं दृष्टोत्पत्तीस येते.

'प्रभाकर'कर्त्यांचें वैशिष्ट्य त्यांच्या निर्भय व सडेतोड वृत्तींत आहे. न्याय्य गोष्टींचा पुरस्कार करण्यास ते केव्हाहि मागेपुढे पाहत नसत. पहिल्या वर्षी प्रभाकरांत सातारच्या राज्यप्रकरणासंबंधी निर्भीड लेखमाला येत होती; पण त्या बाबतींत सरकारकडून कांही इशारत मिळाल्यामुळे ती मध्येच अर्धवट सोडावी लागली. अिंग्रजी राज-

वटीच्या बऱ्यावाअीट दोन्ही अंगांची ते आपल्या पत्रांत अुद्बोधक चर्चा करीत असत; व लोकांनाहि आपलें मत प्रदर्शित करण्यास पूर्ण वाव देत असत. पहिल्या वर्षीच्या अेका अंकांत 'अेक कोंकणस्थ' या नांवाने विस्तृत पत्र प्रसिद्ध झालें आहे. त्यांत लेखकाने अिंग्रजी राज्यापासून हिंदुस्थानचें किती नुकसान होत आहे, व त्याला आपलाच मूर्खपणा कसा कारणीभूत झाला आहे तें स्पष्ट केलें आहे.

"...विनंती विशेष अिंग्रेज लोक याहीं हिंदुस्थान घेतल्यापासून त्यांचे ग्रंथकार व वर्तमानपत्रवाले त्यांची नेहमी तारीफ करित असतात किं आपल्याकडे हिंदुस्थान आल्यापासून तो देश दिवसंदिवस सुधारत चालला आहे. लोक मोट सुखी होताहेत आणि त्यांचे हातीं हें राज्यें दिल्यावरून अीश्वराने हा हिंदु लोकांवर मोटा अुपकार केला अशी नाना तऱ्हेची बडबड ते करित असतात. त्यास असी बडबड करण्यास त्यांस काय आधार आहे तो मला समजत नाही. परंतु मला अेक वाटतें की हिंदु लोक अज्ञान आहेत तेणेकरून त्यांस आपली स्थिति कोणत्या प्रकारची आहे आणि अुत्तरोत्तर कसी होत जाअील याजविषअी कांहींच समजत नाहीं व दुसरें त्यास अिंग्रेजी भाषेचें ज्ञान नसतें त्यामुळें ते अिंग्रेज लोक ग्रंथातून काय लिहितात हेंही समजत नाहीं. असी संधी सापडल्यामुळें ते अिंग्रेज युरोपांतील दुसरीं मोटमोटी राज्यें आहेत त्यांस भुलथाप देण्याकरितां अशा लबाड्या करितात. त्यास त्यांचा अशा लबाड्या चालुं नये आणि या लोकांस अिंग्रेज लोकांची दगलबाजी समजावी आणि आपले हिंदु लोकांचे या बाबे डोळे अुघडावे अशा हेतुने तुमचासारखे जे विद्वान पुरुष आहेत त्याहीं आपले लेखणीस विसांवां न होतां हमेशा या गोरे लोकांचा काळेपणा यत्किंचित् अुघडकिस

आणावा असा तुमचा धर्म होय असें आसतां आज चार पांच महिने होत आले तुमचे पत्र चाललें आहे परंतु हा विषय अद्यापि तुम्ही काढला नाहीं. त्यास असें करण्याने तुमचे नांवास धक्का आहे, त्यांस अज्ञानतिमिरांतून काढून ज्ञानप्रकाश दाखवावा हा तुमचे प्रभाकराचा हेतु असावा असें मला वाटतें. परंतु ही अटकळ मी तुमचे पत्राचे नावावरून केली आहे. ही खरी किंवा खोटी याचा मला संशय आहे; कांकी आलिकडे अेकदोन पत्रे दुसरीं निघतात त्यांचा नावे पहिलीं तर ज्ञानसिंधु ज्ञानचंद्रोदय असीं आहेत परंतु त्यांचे बुद्धिचा प्रकार पाहूं गेलों असतां ती पत्रें * * * * अशा नामाभिधानास योग्य आहेत, तुमचें पत्र तशा प्रकारचें न व्हावो अशी माझी आशा आहे. तसें झालें असतां तुमचे पत्राचें नांव प्रभाकराचे बद्दल निशाकर असें आह्मीं ठेवूं. परंतु असा प्रसंग येणारच नाहीं तुम्ही फार सुज्ञ आहां आशी आमची खात्री आहे. आतां अिंग्रेज लोक यांहीं हिंदुस्थानावर काय अुपकार केले हें पाहूं गेलों असतां मला अेकही आढळत नाहीं. ते आत्मस्वार्थि लोक परमुलखांतून आलेले मुळचे केवळ बुभुक्षित आणि दरिद्री असे जे लोक ते हिंदुस्थानांत पहिल्यानें आले तेव्हां तेथील संपदा व वैभव पाहून सहजचकित जाहालेच असतील. तेव्हां प्रथमतः त्यांचे मनांत ती संपदा आपले मुलुकांत न्यावी याशिवाय दुसरी कल्पनाच आलि नसेल तेव्हां ती कोणत्या प्रकाराने न्यावी याचा विचार करूं लागलें असतील. पुढे हिंदु लोकांचा मुर्खपणा अुत्तरोत्तर दृष्टिस पडत चालला तेव्हां त्यांस ती गोष्ट सुलभ वाटों लागली, तो मुर्खपणा कसा म्हणाल तर येणेप्रमाणे– अिंग्रेज लोक जेव्हां पहिल्याने हिंदुस्थानांत आले तेव्हां त्यांचा हेतु फक्त व्यापार करण्याचा होता. तेव्हां त्या वेळे

जे राजे या मुलुखांत होते त्यांही त्यांस फक्त व्यापार करण्याची मात्र मोकळीक द्यावयाची होती. परंतु तसें न करिता त्यांस फौज ठेवण्यांची व दारूगोळा व शस्त्रें बाळगण्याची सुट दिल्ही तेणेकरून ते या लोकांचा सहज पराभव करित. ते युद्ध कौशल्यांत मुळचेच फार निपुण होते. बरें पुढें जेव्हां या लोकांहीं पाहिल कीं अिंग्रेज लोक हे आपल्यास अजिंक्य आहेत तेव्हां तरीं विचार करायांचा होता कीं हे लोक आले कोठून यांचा मुलुक आहे कोठे हे आपल्यास कोणत्या बळावर जिंकतांत. परंतु हा विचार अेकीकडेस करून आपआपल्यांत कलह जाला असतां त्यांची मदत्त मागीत आणि त्यांस मुलुक देत असे करून करून त्यांस प्रबळ केलें आणि आपण हिनबळ जाले. हें सगळें अज्ञानाचें फळ. जर हे त्या वेळेस विचार करते कीं हे लोक २००० कोशावरून आलेले परदेशी. आपण या मुलुकांत रहाणारे त्यास त्यांचे अुगीच अन्नपाणीच बंद केलें असतें तर बिचारे आल्या वाटेने परत जाते. याच लोकांची पलटणे तयार करून त्यांही यांसी लढावे परंतु हे हिंदु लोक असें गावदी कीं त्यांचे सारखीं तोफखाना त्यांचे युद्धकौशल्य हें आपण घ्यावें आणि आपणही त्यांचे सारीखें युद्धनिपुण व्हावें आसें त्यांचें मनांतहि आले नाहीं. त्यांही युद्धप्रसंग आला म्हणजे वेडे बागडे लोक जमा करावे आणि हरि विठल म्हणून त्यांचे कवायत शिकलेले लोकांवर हल्ला करावा. अशा त्याहीं आपल्या रानवट चाली आज दिवस पावेतों सोडल्या नाहींत आणि तेणे करून शेवटीं या थाऱ्यास आले. पुण्यांत अखेरचा पेशवा बाजीराव हा तर अितका मूर्ख होता कीं याणे आळशी निरोपयोगी आसल्या लक्षावधी ब्राह्मणास रोज साखरभात आणि बुंदी याचीं जेवणें द्यावीं आणि फौजेस रुकसत दिल्ही. आतां असल्यां मुर्खत्वास काय म्हणावें

पहा बरें जेव्हां अिंग्रेज लोकांहीं पुणें घेतलें तेव्हां ज्या ब्राम्हणांही त्यांचें अन्न खाले ते अुपयोगी पडलें कीं काय ? नाही. तेव्हा पहा बरें जर त्यांचे वाटचें त्या अन्नाचे पैक्याने पलटणी ठेविल्या असत्या तर किति अुपयोगी पडल्या असत्या. असो हा विषय फार मोठा आहे आणि यावर कितीही लिहिलें तरीं संपणार नाहीं आणि तुमचें पत्र तर अुद्यां निघणार वेळ राहिला नाहीं म्हणून हें पत्र येथेंच पुर्ण करतों पुढें जशी जशी फुरसुत मिळेल त्या त्या प्रमाणें आपल्यास या बाबे लिहित जाअीन." —प्रभाकर १३ मार्च १८४२.

लोक निःसत्त्व व दुर्बल झाले होते. त्यांची प्रतिकारक्षमता अजिबात लोपली होती. भाअू महाजन यांनी त्यांना आपल्या कायदेशीर हक्कांची जाणीव करून देअून अन्यायांची दाद लावून घेण्यास प्रोत्साहन दिलें. अिंग्रज अधिकाऱ्यांच्या दोषांवर वेळोवेळीं सडेतोड टीका करून त्यांनी गोऱ्या लोकाविषयींचा आमच्यांतला न्यूनगंड नाहीसा केला. आपलीं गाऱ्हाणीं वृत्तपत्रांत जाहीर करून सरकारच्या नजरेस आणून देण्याची त्यांनी लोकांना शिकवण दिली. प्रभाकरपत्रांत अशा न्याय्य तक्रारींना ते नेहमी प्रसिद्धि देत; व त्यावर टीकाहि करीत असत :—

"पुण्याहून आम्हास अेक पत्र आलें त्याजवरून आमचे समजण्यांत असें आलें आहे कीं एनसायन् पेली, व दुसरा कोणी अेक साहेब हे दोघे कितिअेक रामोसी व माहार बरोबर घेअून काळेवाडी म्हणून अेक लाहानसें गांव पुणें प्रांतात आहे त्यापुढे शिकार करण्याकरितां गेले होते. तेथे नवेंबर महिन्याचे २० वे तारिखेस एनसायन पेली याणे तेथे शिकार निघाली त्यावर गोळी घातली. ती चुकून त्याचा बरोबरचा अेके रामोशास लागली, तेणेंकरून तो रामोसी फार

जखमी झाला आहे. हा रामोशी सांप्रत पुण्याचा इस्पितालांत आहे, व तो जगण्याची आशा नाहीं असें म्हणतात. या रामोशाची सरकारांत जबानी घेतली आहे, त्यांत त्याणे असें लिहून दिले आहे कीं या साहेबाने आपणास द्वेषाने गोळी घातली असें नाहीं. परंतु त्याणे शिकारीवर गोळी घातली ती माझे दुरदैवाने मला चुकून लागली. या अेनसायन पेली साहेबाबरोबर जो दुसरा साहेब शिकारीस गेला होता त्याचा हातून वडगावास काही दिवसावर अेके गरीब ब्राह्मणास शिकारीचे समयीं असेंच प्रकारें चुकून गोळी लागून तो ब्राह्मण मेला. या साहेबाचा हातून वडगांवास अेवढा अनर्थ झाला असतां त्याणे अजून शिकारीचा छंद टाकला नाही, व कांही मनांत दर्द न बाळगतां अेनसायन पेलीबरोबर पुनः लवकरच शिकारीस गेला ही मोठी आश्चर्याची गोष्ट आहे. यांत "मांजराचा झाला खेळ आणि अुंदराचा गेला प्राण" असें होते. टोपीवाले लोक शिकारीस जातात. याजमुळें गरीबगुरीब लोकास अुपद्रव पोचतो, अशी अुदाहरणें पुष्कळ घडतात. त्यास अशे क्षुल्लक कामाकडे टोपीवाल्याही आपला पैका व वेळ न खरचतां दुसरें चांगले विद्येचे व धर्मकृत्याचे कांमाकडे अुपयोग करते तर लोकांस अुपद्रव न पोचतां पुष्कळ फायदा झाला असता यास मोठे मोठे संभावित व प्रतिष्ठित साहेब लोकाही तरी हा शिकारीचा छंद सोडून लाहान अुमेदवार साहेब लोकांस नितीचा धडा लाअून द्यावा.

या अेनसायन पेली साहेबाचा लवकरच कोर्ट मार्शल भरून त्यांत त्याचा तपास होणार आहे असी वदंता आहे."

—प्रभाकर १२ डिसेंबर १८४१.

अिंग्रजी भाषेतील ज्ञानभांडार आत्मसात् करण्याच्या प्रयत्नांत

भाऊ महाजन हे जरी अग्रेसर होते, तरी लोकांच्या स्वाभिमान-शून्यतेची त्यांना मनापासून चीड होती. परकीयांचे सद्‌गुण घेण्यास त्यांची ना नव्हती. पण त्यांच्या पोशाखाचें व चालीरीतींचें गैर-वाजवी अनुकरण करणें त्यांना हास्यास्पद वाटे. ह्या परधार्जिण्या वृत्तीचा त्यांनी वेळोवेळीं तीव्र निषेध केला आहे. त्या वेळीं आमच्या सुशिक्षित वर्गावर पाश्चात्य संस्कृतीचा पगडा बसत चालला होता. कनिष्ठ जातींतील लोकांवर कोठे कोठे मुसलमान संस्कृतीची छाप होती. ह्या दोन्ही गोष्टी प्रभाकरकर्त्यांना हानिकारक वाटत. आपला धर्म, संस्कृति, चालीरीति, भाषा अित्यादिकांचा त्यांना जाज्वल्य अभिमान होता. शारीरिक दास्यापेक्षा बौद्धिक गुलामगिरींत आपला खरा दुबळेपणा आहे, याची त्यांना जाणीव होती. तेव्हा काय वाटेल तें झालें तरी लोकांनी आपलें स्वत्व गमावूं नये, म्हणून ते नेहमी जागरूक असत. हिंदु लोकांतील ताबुतांच्या चालीविरुद्ध 'प्रभाकरां' त अेक पत्र प्रसिद्ध झालें होतें.

"...आतां ज्या कारणासाठीं हे हिंदु लोक ताबूत करावयास लागले तें कारण आतां अगदीं दूर जाहलें असें असतांही परधर्माची चाल हिंदु लोक कां बरें चालवितात! आजपर्यंत पारशी लोकां-मध्येंही फकीरी घेण्याचा संप्रदाय होता, परंतु त्याहीं सभा करून सर्व-संमतानें आलीकडेस ती फकिरी घेण्याची चाल टाकून दिली आहे ......असे हिंदु लोक हा परधर्म कां टाकीत नाहीत! यांत त्यांचे शास्त्राप्रमाणें म्हटलें तर दोष आहे. कसा म्हणाल तर गीतेंत श्रीकृष्ण भगवानजींनीं असें म्हटलें आहे कीं, 'परधर्मो भयावहः'. त्यांस तेहेतीस कोटि देव आणि चार वेद, अठरा पुराणें व अुपपुराणें अितक्यांतील व्रतें अितकीं देखील या हिंदूंस पुरेशीं होत नाहींत

म्हणून हे आणखी ताबुताचें व्रत धारण करतात कीं काय ! ...... ताबुतास नमस्कार करणें आणि बातिस्मा घेऊन विल्सन साहेबांस आपला आचार्य करणें या दोहोंत अगदीं वास्तविक पाहातां भेद नाही ...... याचा विचार करून पारशी लोकांप्रमाणें ताबुतास जो मानील, त्यास बहिष्कृत केलें जाईल अशी कांहीं तजवीज केल्यास ......ही अधर्मप्रवर्तक चाल मोडेल अशी मला आशा आहे."

—प्रभाकर २७ फेब्रुआरी १८४२.

अव्वल इंग्रजींत महाराष्ट्रांतील नवशिक्षितांना मराठी भाषेविषयी बिलकूल आपलेपणा वाटत नव्हता. इंग्रजी शिक्षणामुळे त्यांची दृष्टि दूषित झाली होती. इंग्रजी भाषेंतील मोठमोठ्या युगप्रवर्तक ग्रंथकारांचे नामांकित ग्रंथ वाचून त्यांची मति कुंठित झाली. तिच्या अपार वैभवापुढें त्यांना आपली मायभाषा दरिद्री व दुर्बल दिसूं लागली. तिचें वाङ्मयीन दुर्भिक्ष घालविण्याचा निश्चय करण्याऐवजी ते तिचा तिरस्कार करूं लागले. ज्ञानेश्वर एकनाथांच्या काळीं संस्कृत पंडितांना ज्याप्रमाणे मराठी भाषा तुच्छ वाटत होती, आणि त्यांचा सर्व व्यवहार संस्कृतांत होत होता, त्याप्रमाणे ह्या आधुनिक पंडितांचा सगळा व्यवहार इंग्रजींत चालू झाला. शुद्ध मराठी बोलणें त्यांना अवघड वाटूं लागलें. त्यामुळे नेहमीच्या बोलण्यांतहि जास्तींत जास्त इंग्रजी शब्द वापरण्याचा प्रघात रूढ झाला. संस्कृत भाषाहि जीर्ण व निरुपयोगी आहे अशी त्यांची समजूत होती. तेव्हा साहजिकच मराठी व संस्कृत या दोन्ही भाषांची त्यांनी उपेक्षा चालविली होती. ह्या उद्वेगजनक प्रकाराबद्दल भाऊ महाजन यांनी आमच्या नवीन आंग्लभाषापंडितांच्या डोळ्यांत चांगलें झणझणीत अंजन घातलें. सरकारी शाळांतूनहि मराठीच्या बाबतींत बरीच हय-

गय होत असे. म्हणून त्यांनी मुंबअीच्या शिक्षामंडळीचीहि भरपूर हजेरी घेतली होती. खालील दोन अुतारे वाचून भाअू महाजन यांच्या स्वभाषाभिमानाची ओळख होईल :—

"मुलें व्याकर्ण मात्र करतात परंतु शुद्ध बोलणें व लिहीणें याचे नावें त्यांचा पांचजन्य होतो.... तेव्हां फार काय सांगावें या मराठी शाळांचे हयगअीमुळें सर्व अिंग्रजी शाळांचाहि जो अुद्देश आहे तो पराभूत होतो.... सांप्रत जे मोटाले आपणास अेलफिन्स्तन विद्यार्थी म्हणवितात त्याणीं आपले लोकांस कांहीं समजावयाचें जाहलें तर कित्येक थोडेसे खेरीज करून बाकींचास ती गोष्ट मोठी अवघड येअून पडेल. ...त्यांस असें वाटतें कीं मराठी ती काय केवळ आडु लोकांची भाषा आहे. यामुळें विलियम दि कांकर राजापासून अिंग्लंडांत जसि फ्रेंच भाषा मोटे अिष्की मंडळींत बोलण्याचा परिपाठ कांही दिवस पडला होता. तसाच अिंग्रेजी भाषेचा. घरींदारीं हावेतसें बोलतात. याजमुळें त्यास मराठी म्हणजे केवळ परभाषेप्रमाणे होअूं लागली आहे. सारांश अिंग्रेजी शाळेंतील मुलें मराठी भाषेपेक्षां अिंग्रेजींत अधिक हुशार आहेत असें म्हटल्यास यथायोग्य साजेल."

— प्रभाकर ता. १२ डिसेंबर १८४१.

"सांप्रत मुंबई अेथील हिंदु लोक अिंग्रेजी भाषा आणि विद्या यापासून संसारांत अुपयोग आहे म्हणोन त्या शिकणें हाच मोठा पुरुषार्थ मानून त्यांत सर्व वेळ खर्च करितात. आणि देशपरंपरागत जी स्वभाषा किंवा त्या भाषेचें मूळ आणि धर्मशास्त्र पुराणें यांच्या ज्ञानास साधन अशी जी संस्कृत भाषा तिचा अभ्यास करण्याकडेस कांहींच लक्ष देत नाहींत. यामुळें अेथील लोकांची भाषा व स्थितीरीती हीं विलक्षण होत चाललीं आहेत. ती अशी

कीं, ते बोलूं लागले असतां पंचवीस शब्दांमध्यें वीस शब्द अिंग्रजी येअून मध्यें विभक्ति, अव्ययें, सर्वनामें आणि प्रसिद्ध क्रियापदें अितकीं मात्र बहुधा स्वभाषेचीं अुपयोगांत आणतात. तसेंच नमस्कार करणें अथवा आगतस्वागत विचारणें झाल्यास अिंग्रेजी शब्दांनीं करितात. कोणी स्नेही आला असतां अिंग्रेजाप्रमाणें त्याचा हात धरितात. आणि ते देवळांत गेले असतां टोपी काढितात, त्याप्रमाणें आपण पागोटे काढतात. हा अेक दृष्टान्त लिहिला, पण याचप्रमाणें आणखी बहुत सांप्रदाय पडत चालले आहेत. त्याहीकरून असें होतें कीं, प्रौढ भाषा, आणि आमचे शिष्टसंप्रदाय यांचाच ज्यास जन्मापासून अभ्यास त्यांची व अेथील लोकांची गांठ पडली असतां त्यांस हे जसे द्वीपान्तरचे लोक तसे भासतात आणि त्यांचें स्वरूप यास न समजून आपलें हेंगाडें बोलणें त्यांस समजत नाहीं अेवढ्याचरच हे त्यास वेडे ठरवून अुपहास करितात.

अशा समयीं आमची रीति, स्थिति, धर्म यांची माहितगारी अथवा याचें ज्ञान होण्यास साधन जी संस्कृत भाषा तिचा अभ्यास सुलभ होण्याचा अुपाय जितका होअील तितका चांगला आणि हा अुपाय जो करील तो स्तुतीस पात्र होय.”

—प्रभाकर ८ मे १८४२.

अव्वल अिंग्रजींत स्त्रीशिक्षण, बालविवाह, जरठ-कुमारीविवाह, पुनर्विवाह अित्यादि सामाजिक प्रश्नांचा लोक विचार करूं लागले होते. स्त्रीशिक्षणाचा सर्वमान्य प्रश्न वगळल्यास अितर सामाजिक बाबतींत भाअू महाजन यांचीं मतें कांहींशीं प्रतिगामी असावींत असें वाटतें. मात्र ‘प्रभाकरां’त ते निःपक्षपातीपणाने दोन्ही पक्षांच्या प्रचाराला स्थान देत असत. पुनर्विवाहासंबंधीच्या वादांत त्यांनी दोन्ही

बाजूंचीं पत्रें प्रसिद्ध केलीं आहेत. पण आपला स्वतःचा अभिप्राय पुनर्विवाहाच्या विरुद्ध दिला आहे. वृत्तपत्रांत प्रत्येक प्रश्नाचा सर्वांगीण विचार होऊन लोकांना स्वतंत्रपणें आपलें मत बनविण्याची संवय व्हावी, अशी प्रभाकरकर्त्यांची भूमिका होती. त्यांच्या दृष्टींत संकुचितपणा तिळमात्र नव्हता. लोकहितवादींसारख्या क्रांतिकारक समाज-सुधारकाच्या ज्वलजहाल पत्रांना भाऊ महाजनांनी प्रभाकरांत प्रसिद्धि दिली, यावरूनच त्यांच्या मनाचा मोठेपणा व्यक्त होतो. देशमुखांचीं शतपत्रें नुकतींच पुनर्मुद्रित झालीं आहेत. त्यांत सुधारणाप्रेरक अनेक पत्रें पाहावयास सांपडतील. येथे सनातनी पक्षाचें अेक पत्र अुद्धृत करतों. त्यावरून त्या वेळच्या वादांतील कोटिक्रम ध्यानांत येतील.

"प्रभाकराचे कर्ते यास—

महाराज आपले मागल्ये पत्रांत बेळगांव मुकामीं दोन ब्राह्मणाचे विधवा स्त्रियांचे पुनर्विवाह जाहाले असें आपण लिहिलें. ही गोष्ट अैकून मला फार आश्चर्य वाटलें.कारण हा अधर्माचा पाया मुख्यत्त्वें ब्राह्मणाईंच घातला असें याजवरून सिद्ध होतें. धर्मशास्त्रांत असें आहे कीं ब्राह्मणास अेकदा ब्राह्मणानें अथवा दुसरे कोणी दान दिलें तर तें परत घेणें वर्ज केलें आहे. बरे जर त्या स्त्रीनें स्वयंवर करावें असें कोणी म्हणेल तर जी विधवा स्त्री स्वयंवर करणार तिचा मेलेल्या भ्रताराचे जे कुलपुरुष असतील ते तिचे सुहृद, सबब त्याजबरोबर तर पुनर्विवाह होणार नाहीच परंतु जर तिणें दुसरे कुलांतील पुरुषाबरोबर स्वयंवर केलें तर शास्त्रांत असें आहे कीं जी स्त्री कुलांतून गेली तिचा घटस्फोट त्या कुलपुरुषांस केला पाहिजे. बरें तो घटस्फोट केला म्हणजे ती विधवा स्त्री प्रेतरूप जाहाली आणि

तिजबरोबर लग्न करणारा पुरुष किती शास्त्रास अबद्ध चालला असें होअील.

अहो महाराज, प्राचीन कालांत असें होतें की अल्पवयी मरण हें क्वचित् सहस्रांत अेखादच होत असे. परंतु हाल्लि याचा प्रादुर्भाव विशेषच होत चालला याचें मूळ कारण शोधून काढावें तें तर अेकाकडेच राहिलें परंतु ही शास्त्रविरुद्ध मतें काढून अधर्मप्रवर्त करावा हें अगदी नीट नाही. पुरुषानें सोळा वर्षांपलीकडे व स्त्रीचें दश वर्षांपलीकडे लग्न करावें म्हणजे तेणेंकरून स्त्रीस बालवैधव्य प्राप्त होणें क्वचितच घडण्यांत येअील व धर्मसंरक्षण होअील व असें करण्यानें विशेषेंकरून असें होअील कीं स्त्री पुरुषांचा संयोग काळीं होअून त्यापासून जी प्रजा होअील ती शरीरानें सुपिंड होअून अल्पवयी सहसा मरणार नाहीं. अल्पवयी स्त्री-पुरुष मरण पावून हे जे वियोग होतात त्याचे कारण हाल्लि जी अगदि अल्पवयांत लग्नें करतात तींच मुख्यत्त्वें आहे.

तुमचा मित्र,
धर्माभिमानी"

—-प्रभाकर ६ फेब्रुआरी १८४२.

भाअू महाजन यांची विचारसरणी आकुंचित व अेकांगी नव्हती. भौतिक ज्ञानाच्या बाबतींत आपण पुष्कळच मागे आहोंत हें शल्य त्यांना सारखें बोंचत होतें. हरप्रयत्नानें आपण ज्ञानसंपन्न झाल्यावांचून, जगाच्या ह्या धकाधकीच्या मामल्यांत आपला निभाव लागणार नाही, याची त्यांना जाणीव होती. म्हणून 'प्रभाकरा'च्या प्रत्येक अंकांत त्यांनी ज्यामुळे लोकांची बौद्धिक अुंची थोडी तरी वाढेल, अशा विषयांचें सोप्या भाषेंत मार्मिक विवेचन करण्याचा

परिपाठ ठेवला. ज्या वेळीं तत्कालीन पंडित पाठ्यपुस्तकांचीं भाषान्तरें करण्यांत निमग्न झाले होते, त्या वेळीं भाऊ महाजन लोकांना 'ग्रेट ब्रिटन देशाची राजनीति' व 'फ्रेंचांचे बंडाचा वृत्तांत' या विषयांची माहिती देत होते. ह्या दोन्ही लेखमालांसंबंधी त्यांच्या अेका समकालीनाचें मत येथे नमूद करतों.त्यावरून त्यांचा हा अुपक्रम किती अभिनव व गौरवार्ह होता हें ध्यानांत येअील.

"तुमचे पत्रांत अलिकडेस 'ग्रेट ब्रिटन देशाची राजनीती' आणि 'फ्रेंचांचे बंडाचा वृत्तांत' हीं दोन्ही फार अुपयोगी प्रकरणें असतात. तेणेंकरून त्या पत्राची विद्वान् लोकांत फार तारिफ होत हीं चालली आहे आणि पुढें काही दिवस जर असेंच चाललें तर तुम्ही फार विद्वान् व बहुश्रुत अशी तुमची कीर्ती या देशांत चिरकाल राहील यांत संशय नाही." —प्रभाकर २४ अेप्रिल १८४२.

भाअू महाजन हे त्या वेळीं मराठी भाषेंतील अुत्कृष्ट लेखक म्हणून प्रसिद्ध होते.[1] परंतु 'प्रभाकरां'तील भाषा आजच्या मानाने पुष्कळच अशुद्ध, अव्यवस्थित, व ओबडधोबड वाटते. व्याकरणाच्या चुका बऱ्याच आढळतात. मधून मधून अिंग्रजी प्रयोग व वाक्यरचना यांची छापहि दृष्टीस पडते. भाषा कमावलेली नसल्यामुळे विचारांचा कोंडमारा होतो आहे असें स्पष्ट दिसतें. त्या काळची परिस्थिति ध्यानांत आणली, म्हणजे ह्या सर्व दोषांचा आपोआप अुलगडा होतो. दादोबांचें संक्षिप्त व्याकरण नुकतेंच प्रसिद्ध झालें होतें. भाषेवर व्याकरणाचा संस्कार फारसा झालेला नव्हता. गद्य

---

१ "प्रभाकरपत्र रा. रा. भाऊ महाजन हे काढीत असत. हे गृहस्थ विद्वान् असून पहिल्या प्रतीचे मराठी लिहिणारे होते."

—बाबा पदमनजी, अरुणोदय पृ.८८.

